महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ अंतर्गत प्रोत्साहनपर लाभ योजना-शुद्धीपत्रक.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्र.संकिर्ण०८२३/प्र.क्र.६३/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ५ मार्च, २०२४

**<u>वाचा</u> :-** शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. प्रोअयो ०६२२/प्र.क्र.७२/२-स, दि.२९.०७.२०२२.

**<u>शासन शुद्धीपत्रक</u> :**

महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ अंतर्गत प्रोत्साहनपर लाभ या योजनेंतर्गत अल्पमुदत पीक कर्जाची पुर्णतः परतफेड केलेल्या शेतकऱ्यांना पीक कर्जाच्या रक्कमेवर जास्तीत जास्त रु. ५० हजार पर्यंत प्रोत्साहनपर लाभ देण्यात येतो.

तथापि, कोल्हापूर जिल्हयातील ऊस पिकासाठी एका आर्थिक वर्षात दोन वेळा पीक कर्ज घेऊन योजनेच्या निकषानुसार त्याची विहीत मुदतीत परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना सदर योजनेचा लाभ मिळण्याबाबत मा. लोकप्रतिनिधींनी केलेली विनंती विचारात घेऊन,केवळ कोल्हापूर जिल्ह्याकरिता, शासन कार्य नियमावली मधील कलम २९ (१) च्या तरतुदी नुसार उक्त योजनेच्या दि. २९.०७.२०२२ च्या शासन निर्णयातील (I) योजनेचा तपशील - (३) यामध्ये नमूद असलेल्या मूळ तरतुदीमध्ये खालीलप्रमाणे केलेल्या बदलास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**(I) योजनेचा तपशील -**

३) सन २०१७-१८ या वित्तीय वर्षात घेतलेले अल्प मुदत पीक कर्ज दि. ३० जून २०१८ पर्यंत पूर्णतः परतफेड केलेले असल्यास, सन २०१८- १९ या वित्तीय वर्षात घेतलेले अल्प मुदत पीक कर्ज दि.३० जून २०१९ पर्यत पूर्णतः परतफेड केलेले असल्यास, सन २०१९-२० या वित्तीय वर्षात घेतलेले अल्प मुदत पीक कर्ज दि.३१ ऑगस्ट २०२० पर्यत पूर्णतः परतफेड केलेले असल्यास अथवा सन २०१७-१८, २०१८- १९ व २०१९-२० या तीन्ही वित्तीय वर्षात बँकेच्या मंजूर धोरणाच्या अनुषंगाने पीक कालावधीनुसार कर्ज उचल दिनांक व बँकेच्या धोरणानुसार कर्ज परतफेडीचा देय दिनांक हे दोन्ही दिनांक विचारात घेऊन यापैकी परतफेडीचा जो दिनांक नंतरचा असेल त्या दिनांकापूर्वी कर्जाची पूर्णतः परतफेड (मुद्दल + व्याज) केली असल्यास, अशा शेतकऱ्यांना त्यांनी सन २०१८-१९ 'अथवा सन २०१९-२० या वर्षात घेतलेल्या अल्प मुदत पीक कर्जाच्या मुद्दल रकमेवर जास्तीत जास्त रु. ५० हजार पर्यत प्रोत्साहनपर रक्कम लाभ म्हणून देण्यास मान्यता देण्यात येत आहे. मात्र सन २०१८-१९ अथवा सन २०१९-२० या वर्षात घेतलेल्या व त्याची पूर्णतः परतफेड केलेल्या अल्पमुदत पीक कर्जाची रक्कम रु. ५० हजारांपेक्षा कमी असल्यास, अशा शेतकऱ्यांना त्यांनी सन २०१८-१९ अथवा सन २०१९-२० या वर्षात प्रत्यक्ष घेतलेल्या अल्पमुदत पीक कर्जाच्या मुद्दलाच्या रकमेइतका प्रोत्साहनपर लाभ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयात वरीलप्रमाणे केलेल्या अंशत: बदलानुसार, उक्त योजनेंतर्गत नव्याने पात्र ठरणाऱ्या कर्जखात्यांचा पीक कर्ज उचल दिनांक व कर्ज परतफेड दिनांक याबाबत सहकार विभागांच्या अखत्यारीतील क्षेत्रिय कार्यालयातील कार्यरत लेखापरीक्षकांकडून तपासणी करुन व त्यांनी तसे प्रमाणित केल्यानंतरच सदर कर्जखात्यांना योजनेतील बदलानुसार लाभ दिला जाईल.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं. क्र.१८६/२०२४/व्यय-२, दि.२८.०२.२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३०५१५५७४५२२०२ असा आहे. सदर शासन शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUJATA MAYUR BHAVSAR

Digitally signed by SUJATA MAYUR BHAVSAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=409e9774a7d1ea9c8d3e125716d4e57b62e42f958e738b4526fe909870e0fb38, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3E1E426F74F1978EA7797E86DAB9645CCFC7C08D9F395ABD71E88BAEB3731288, cn=SUJATA MAYUR BHAVSAR
Date: 2024.03.05 16:07:02 +05'30'

**( सुजाता भावसार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विधानसभा सदस्य/ विधानपरीषद सदस्य (सर्व)
५) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे.
८) मुख्य महाप्रबंधक, भारतीय रिझर्व बँक, केंद्रीय कार्यालय, मुंबई.
९) मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड प्रादेशिक कार्यालय, पुणे.
१०) चेअरमन, राज्य स्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे
११) विभागीय आयुक्त (सर्व)
१२) जिल्हाधिकारी (सर्व)
१३) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
१४) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि.,मुंबई.
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक (सर्व).
१८) निवडनस्ती (कार्यासन २-स).